भूमि अभिलेख विभागासाठी GNSS Rovers Controllers व Post Processing Software खरेदी करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: राभूअ-२०२१/प्र.क्र.३८६/ल-१**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक: २० मार्च, २०२३.

**वाचा:-**

१) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक: राभूअ २०१४/प्र.क्र.२४३/ल-१, दिनांक २५/११/२०१४.
२) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक: राभूअ-२०२०/प्र.क्र.५४/ल-१, दिनांक ११/०९/२०२०.
३) जमाबंदी आयुक्त व संचालक भूमि अभिलेख (म.राज्य) पुणे यांचेकडील क्र.पु.मो.१/प्र.क्र.१८५/५/२०२३, दि.१०.०२.२०२३ चा प्रस्ताव.

**प्रस्तावना**

वाचा क्र.१ च्या शासन निर्णयान्वये भूमि अभिलेख विभागासाठी १६९२ ई. टि. एस. मशिन खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता दिलेली होती. तदनंतर वाचा क्र.२ च्या शासन निर्णयान्वये रु.६१.१४ कोटी CORS Rovers आणि रु.१५.०० कोटी ई. टि. एस. मशिन खरेदी करणेसाठीच्या दुरुस्तीस मान्यता देण्यात आलेली आहे. याबाबत जुलै,२०२२ च्या पावसाळी अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीद्वारे रु.१५ कोटी व डिसेंबर, २०२२ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीद्वारे रु.३० कोटी इतका निधी असा एकूण ४५ कोटी निधी GNSS Rovers Controllers व Post Processing Software खरेदी करण्यासाठी वितरीत करण्यास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. त्यानुसार रु.४५ कोटी इतका निधी जमाबंदी आयुक्त व संचालक भूमि अभिलेख (म.राज्य) पुणे यांना उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय**

भूमि अभिलेख विभागासाठी GNSS Rovers Controllers व Post Processing Software खरेदी करण्यासाठी पुरक मागणीद्वारे अर्थसंकल्पित करण्यात आलेला रु. ४५,००,००,००० /-(रूपये पंचेचाळीस कोटी फक्त) इतका निधी वितरीत करण्यास खालील अटींच्या अधीन राहून याद्वारे मान्यता देण्यात येत आहे:-

१. राज्यातील भूमि अभिलेख कार्यालयांतील GNSS Rovers Controllers व Post Processing Software खरेदी करण्यासाठी रू.४५,००,००,०००/-(रूपये पंचेचाळीस कोटी फक्त) इतका निधी प्राप्त होणाऱ्या देयकानुसारच आहरित करून खर्च करण्यात यावा.
२. वर्षाअखेर कोणताही निधी अखर्चित राहणार नाही. मागील आर्थिक वर्षातील व चालू आर्थिक वर्षातील वितरीत निधी अखर्चित राहिल्यास तो दि. ३१/०३/२०२३ रोजी शासनास समर्पित करणे आवश्यक आहे.

३. सदर खर्च करताना वित्त विभागाने निधी वितरणाच्या संदर्भात वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार कार्यवाही करणे आवश्यक राहिल.

४. यासाठी होणारा खर्च "मागणी क्र. सी-१, जमीन महसूल १०३(०२) जिल्हा भूमि अभिलेख (२०२९०४२२)-१३-कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात मंजुर अनुदानातुन खर्ची टाकण्यात यावा.

५. जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.राज्य), पुणे यांनी सदर निधी आहरित करून संबंधितांना देयके अदा करण्याची कार्यवाही त्वरीत करावी. प्रस्तुत निधीबाबत आर्थिक व भौतिक अहवाल उपयोगिता प्रमाणपत्रासह शासनास पाठवावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १४/२०२२/व्यय-१० दि.२८/०२/२०२३ नुसार प्राप्त मान्यतेनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२०१७५३२०१०१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAMESH NAMDEO JAGTAP

Digitally signed by RAMESH NAMDEO JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=0c19f5aff07e8e032316c50df2eee86d4eadc6e4ac1e502c4ce53a7762e7e059, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B42F1BB542CD2BC481C3C6F994B28EBD58BB368E14A9C6CBD23808C8315A965C, cn=RAMESH NAMDEO JAGTAP
Date: 2023.03.20 17:59:09 +05'30'

**(रमेश जगताप)**
**अवर सचिव**

**प्रत -**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राज भवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव.
३. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव.
४. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई/नागपूर
८. कोषागार अधिकार, पुणे
९. वित्त विभाग, कार्यासन क्र. व्यय १०/अर्थसंकल्प ६, मंत्रालय, मुंबई
१०. माहिती तंत्रज्ञान संचालनालय, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
११. माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई (५ प्रती प्रसिध्दीकरीता)
१२. निवड नस्ती, ल-१.